राज्य आरोग्य धोरण तांत्रिक सल्लागार समिती स्थापन करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्र. CompNo. १०४६६६८/PHD-१६/२३/२०२५-PHD आरोग्य-३,**

गो.ते.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक: २१ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभाग सार्वजनिक आरोग्याशी संबंधित विविध धोरणे तयार करतो. ही धोरणे केंद्र सरकारच्या मार्गदर्शक तत्त्वांवर आणि राज्याच्या स्थानिक गरजांवर आधारित तयार केली जातात. पुराव्यावर आधारित आणि ज्ञान-आधारित धोरण निर्मिती आरोग्य क्षेत्रासाठी आवश्यक आहे. या क्षेत्रात अनेक नवीन तंत्रज्ञान, नवकल्पना, कार्यक्रम आराखडे उदयास येत आहेत आणि शासनाला सतत विविध तज्ञ आणि भागधारकांकडून माहितीची आवश्यकता असते. आरोग्य धोरण आणि तंत्रज्ञानाच्या मुद्द्यांवर सल्ला देण्यासाठी एक संस्थात्मक यंत्रणा प्रदान करण्यासाठी, एक स्थायी समिती स्थापन करणे शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन याद्वारे खालील स्थायी समिती स्थापन करीत आहे. या समितीला "राज्य आरोग्य धोरण आणि तांत्रिक सल्लागार समिती "State Health Policy and Technical Advisory Committee (SHPTAC)" म्हणून संबोधले जाईल. शासनास आरोग्य धोरण आणि तंत्रज्ञानाच्या ज्या मुद्द्यांवर सल्ला घेणे आवश्यक वाटतील, तेच विषय सदर समिती समोर ठेवण्यात येतील.

**राज्य आरोग्य धोरण आणि तांत्रिक सल्लागार समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-**

| क्र. | संस्था | पदनाम | संख्या | भूमिका/कार्य | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | **आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई** | संचालक, आरोग्य सेवा | १ | आयोजक (Convener) | पदसिध्द |
| २ | **वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई** | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन | १ | सदस्य | पदसिध्द |
| ३ | **आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई** | अतिरिक्त संचालक | ४ | सदस्य | पदसिध्द |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | **आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई** | सहसंचालक | १ | सदस्य | पदसिध्द- संबंधित विषयाचे कार्यक्रम प्रमुख |
| ५ | **जिल्हा प्रशासन** | जिल्हाधिकारी, महानगर पालिकेचे आयुक्त, जि.प. मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी एक) | ३ | सदस्य | शासनाकडून नावासहीत नामनिर्देशित करण्यात येतील. |
| ६ | **जिल्हा आरोग्य प्रशासन** | जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी, MOH - (प्रत्येकी एक) | ३ | सदस्य | सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत नावासहित नामनिर्देशित करण्यात येतील. |
| ७ | **शुश्रुषा संवर्ग** | शुश्रुषा संवर्गातील प्रतिनिधी | २ | सदस्य | सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत नावासहित नामनिर्देशित करण्यात येतील. |
| ८ | **संलग्न आरोग्य व्यावसायिक** Allied Health Professionals (AHP) | संलग्न आरोग्य व्यावसायिक प्रतिनिधी | २ | सदस्य | सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत नावासहित नामनिर्देशित करण्यात येतील. |
| ९ | **वैद्यकीय शिक्षण** | विषय तज्ञ | २-५ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की वैद्यकीय शिक्षण विभागामार्फत नामनिर्देशित असतील. |
| १० | **सार्वजनिक आरोग्य विषयातील तज्ञ** | विषय तज्ञ | २-५ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत नामनिर्देशित असतील. |
| ११ | ICMR **संस्था** | २ तज्ञ | २ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की ICMR मार्फत नामनिर्देशित असतील. |
| १२ | Indian Public Health Association (IPHA) | २ तज्ञ | २ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की IPHA मार्फत नामनिर्देशित असतील. |
| १३ | Indian Association of Preventive and | २ तज्ञ | २ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की IAPSM मार्फत |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | Social Medicine (IAPSM) | | | | नामनिर्देशित असतील. |
| १४ | Public Health Foundation of India (PHFI) | तज्ञ | २ | सदस्य | संबंधीत विषयातील तज्ञ जे की PHFI मार्फत नामनिर्देशित असतील. |
| १५ | **सामाजिक संघटना** (Community Organisation) | प्रतिनिधी | २ | सदस्य | सार्वजनिक आरोग्य क्षेत्रात कार्य करणा-या सामाजिक संघटना यांचे प्रतिनिधी ज्यांचे नामनिर्देशन सार्वजनिक आरोग्य विभाग करेल |
| १६ | World Health Organisation (WHO) | विषय तज्ञ | १ | सदस्य | जागतिक आरोग्य संघटनेकडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| १७ | UNICEF | विषय तज्ञ | १ | सदस्य | UNICEF कडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| १८ | PATH | विषय तज्ञ | १ | सदस्य | PATH या संघटनेकडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| १९ | State Health Systems Resource Centre (SHSRC) | प्रतिनिधी | १ | सदस्य | SHSRC कडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| २० | Indian Medical Association (IMA) | प्रतिनिधी | १ | सदस्य | IMA कडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| २१ | Indian Association of Pediatrics (IAP) | प्रतिनिधी | १ | सदस्य | IAP कडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| २२ | Federation of Obstetrics and Gynecological Societies of India (FOGSI) | प्रतिनिधी | १ | सदस्य | FOGSI कडून नामनिर्देशित विषयतज्ञ |
| २३ | **आरोग्य विषयक तंत्रज्ञान** | १ तज्ञ | १ | सदस्य | सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत नामनिर्देशित आरोग्य विषयक तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ञ. |

२. नामनिर्देशित सदस्यांचा कार्यकाळ एक वर्षाचा असेल. पदसिद्ध सदस्यांना न गणता समितीच्या कोणत्याही सभेचा कोरम दहा राहील.

३. राज्य सरकार कोणत्याही धोरण, नवीन तंत्रज्ञान किंवा कार्यक्रम अंमलबजावणीच्या सल्ल्यासाठी राज्य आरोग्य तांत्रिक धोरण सल्लागार समितीकडे सल्ला घेऊ शकेल. शासनास आवश्यक वाटतील, तेच विषय सदर समिती समोर ठेवण्यात येतील. सल्ला घेण्यासाठी सरकारकडून निर्देश प्राप्त झाल्यावर, राज्य आरोग्य धोरण आणि तांत्रिक सल्लागार समिती (SHPTAC) एकत्र येईल आणि खालील कार्यक्षेत्रांतर्गत नमूद केलेली कामे पार पाडेल. SHPTAC दर तीन महिन्यांनी एकदा किंवा आवश्यकतेनुसार त्यापूर्वी एकत्र येईल.

४. SHPTAC चे कार्यक्षेत्र खालीलप्रमाणे असेल:

(a) कोणत्याही धोरण सूचनेचे फायदे आणि तोटे तपासणे आणि विश्लेषण करणे आणि त्याच्या स्वीकाराबाबत किंवा अन्यथा सल्ला देणे.

(b) कोणत्याही नवीन आरोग्यविषयक तांत्रिक उपकरण/साधनांचे परीक्षण आणि विश्लेषण करणे आणि त्याचे खर्च प्रभावीतेच्यासह (cost effectiveness) तांत्रिक मूल्यांकन करणे, आणि त्याच्या स्वीकाराबाबत किंवा अन्यथा सल्ला देणे.

(c) सार्वजनिक आरोग्य विषयांवर धोरण आणि तांत्रिक मार्गदर्शक तत्त्वांवर सल्ला देणे.

(d) कोणत्याही आरोग्य कार्यक्रमाचे मूल्यमापन करणे.

(e) सार्वजनिक आरोग्याशी संबंधित नियामक मुद्द्यांवर सल्ला देणे.

(f) सार्वजनिक आरोग्यातील संभाव्य संशोधन क्षेत्रांवर सल्ला देणे.

(g) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या निर्देशाप्रमाणे सार्वजनिक आरोग्याशी संबंधित कोणत्याही अन्य बाबींवर सल्ला देणे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळा वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२११३४४५००७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: cn=Shivdas Mahadeo Dhule, o, ou, email=shivdas.dhule@nic.in, c=US
Date: 2025.04.21 14:43:51 +05'30'

**(शि. म. धुळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महाराष्ट्र राज्याचे मा.राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (विधी व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मुंबई
१०. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१२. संचालक, आरोग्य सेवा (२), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
१३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), मुंबई/पुणे.
१४. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
१५. सहाय्यक संचालक, ( लेखा व सेवा परिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१, मुंबई.
१७. वित्त विभाग (अर्थ-३/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई-३२.
१८. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई.
१९.निवड नस्ती (आरोग्य-३).